**दहशतवाद, दंगल, बॉम्बस्फोट व नक्षलवादी कारवाया इत्यादी मानवनिर्मित आपत्तींमध्ये जखमी झालेल्या आपदग्रस्तांना द्यावयाच्या मदतीचे सुधारित निकष व दर**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीएलएस-२०१८/प्र.क्र.९८/म-३,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: १५ सप्टेंबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ–११-०३/प्र.क्र.३०१/म-३, दिनांक २४ ऑगस्ट २००४.

२) शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ/१२-०८/प्र.क्र.३१०/म-३, दिनांक ०१ डिसेंबर २००८

३) शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१४/६३/प्र.क्र.३२९/म-३, दिनांक ५ जानेवारी,२०१६

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्रमांक १ व २येथील शासन निर्णयांन्वये दहशतवादग्रस्त व दंगलग्रस्त आपदग्रस्तांना मदत देऊन त्यांचे पुनर्वसन करण्याबाबतची योजना अंमलात आणण्यात आली आहे. या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना मालमत्ता नुकसानीसंदर्भात द्यावयाच्या मदतीचे दर संदर्भाधीन क्रमांक३ येथील शासन निर्णयान्वये सुधारीत करण्यात आले असून यामध्ये नक्षलवादी कारवायांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांचा समावेश करण्यात आला आहे.

दहशतवाद, दंगल, बॉम्बस्फोट व नक्षलवादी कारवाया इत्यादी मानवनिर्मित आपत्तींमध्ये जखमी होणाऱ्या आपदग्रस्तांना द्यावयाच्या मदतीचे सुधारीत निकष व दर लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय :-**

दहशतवाद, दंगल, बॉम्बस्फोट व नक्षलवादी कारवाया इत्यादी मानवनिर्मित आपत्तींमध्ये जखमी झालेल्या आपदग्रस्तांना खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मदतीचे दर लागू करण्यात येत आहेत.

| अ.क्र | बाब | मदतीचे दर |
|---|---|---|
| १. | वरील घटनांमध्ये हात, पाय, डोळे अथवा शरीरातील कोणताही अवयव निकामी झाल्यामुळे येणारे अपंगत्व | १. २५ ते ३९ % अपंगत्व असल्यास रु. ५०,०००/-<br>२. ४० ते ६०% अपंगत्व असल्यास रु. १,००,०००/-<br>३. ६०% पेक्षा अधिक अपंगत्व असल्यास रु. २.०० लक्ष. |
| २. | वरील घटनांमध्ये जखमी व्यक्ती रूग्णालयात दाखल झाला असल्यास | १. ३ दिवसाच्या कालावधीपर्यंत किमान रु. ३०००/-<br>२. ३ दिवसांपुढील प्रत्येक दिवसाकरिता रु. १०००/-<br>३. अधिकतम १४ दिवसासाठी रु. १४०००/- |

२. <u>उपरोक्त मदत ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून लागू करण्यात यावी.</u>

१) अंपगत्वाचे प्रमाण व त्याच्या कारणाबाबत शासकीय रुग्णालयातील प्राधिकृत वैद्यकीय अधिकाऱ्याने प्रमाणित करणे आवश्यक राहील. अंपगत्व हे त्याच घटनेमुळे निर्माण झाले असले पाहीजे.

२) रुग्णालयात दाखल केलेल्या प्रकरणी संबंधित रुग्णालयाच्या प्राधिकृत वैद्यकीय अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र.

३) संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांच्यामार्फत मदतीचे वाटप करण्यात यावे.

४) संबंधित आपदग्रस्त व्यक्ती यांचा अशा घटनांमध्ये नोंदविण्यात आलेल्या गुन्ह्यांमध्ये किंवा प्रथम खबरी अहवालामध्ये नामोल्लेख नसावा वा त्यांचेवर या घटनेसंदर्भातील कोणतेही गुन्हे दाखल नसावेत याची खातरजमा पोलिस विभागाकडून करुन घेण्यात यावी.

३. याबाबतचा खर्च “मागणी क्र.सी-५, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-२००-इतर कार्यक्रम, (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य, ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ ०३४७) या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक३०२/२०१८/व्यय-९ दिनांक २०.०८.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१५१११९४०९४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Ramchandra Bagane

Digitally signed by Dilip Ramchandra Bagane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d9bdeba4f5b208a7811899a0f4522d8086dc2e6e2655bea26b70db55378254d2, serialNumber=a4ff332f80ce4e5a25f28d86597d7ac1c7ca6c95d9241be4eb51488570f63a29, cn=Dilip Ramchandra Bagane
Date: 2018.09.15 11:23:28 +05'30'

**(दि. रा. बागणे)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-३२
४. महाराष्ट्र विधानमंडळातील सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव , मंत्रालय, मुंबई-३२
६. सर्व विभागीय आयुक्त.
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व १, मुंबई/नागपूर
१०.महालेखापाल (लेखा परीक्ष्ज्ञा), महाराष्ट्र-१ व १, मुंबई/नागपूर
११.संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
१२.वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय, मुंबई-३२.
१३.निवड नस्ती (कार्यासन म-३), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.